# दुकानात अडकलेली चिऊताई

जॉय



जार्ज आणि हैरी, दोघे आपल्या स्केटबोर्ड वरून व्हिडिओच्या दुकानात गेले. दुकान बंद होते. दरवाजावर एक नोटिस लावली होती. त्यांनी खिडकीतून आत पाहिलं. आत एक चिमणी अडकली होती. दुकानाचा मालक २ आढवड्यासाठी शहराच्या बाहेर गेला होता. आणि चिमणीपर्यंत या दोघांना पोहोचणं अशक्य होते. या मुलांनी लवकर काही प्रयत्न केले नाहीत तर चिमणी बिचारी आतमधे मरून जाईल.

मुलांनी शहरातील मोठ्या माणसांना विनंती केली पण कुणीही चिमणीला वाचविण्यासाठी प्रयत्न केला नाही. एक मोठा माणूस तर म्हणाला, "एक चिमणी तर आहे....मेली तर काय झालं? एव्हढ्या चिमण्या आहेत."

जार्ज आणि हैरीने हार मानली नाही. ते सरळ महापौराकडे गेले आणि त्यांना विनंती केली. महापौरांनी अर्थातच मदत केली. अश्या प्रकारे या दोन मुलांनी इवल्या चिमणीचे प्राण वाचविले.

# दुकानात अडकलेली चिऊताई

मराठी : गार्गी लागू





नववर्ष दिनी, जार्जआणि हैरी, यांनी भाड्याने व्हिडिओ आणला होता, तो परत करण्यासाठी दोघे व्हिडिओच्या दुकानात गेले.




व्हिडिओचे दुकान बंद होते. दुकानावर एक चिठ्ठी चिटकविलेली होती. दुकान १३ जानेवारी म्हणजे २ आढवड्यानंतर उघडणार होते. चिठ्ठीच्या खाली पत्रपेटीसारख्या दिसणार्या फटीतून त्यांनी व्हिडिओ आत ढकलला, तो आत एका डब्यात पडला.



हैरीने आपले नाक खिडकीच्या काचेवर दाबून आत पहाण्याचा प्रयत्न केला. तो म्हणाला, "अरे जार्ज, बघ! एक चिमणी! ती दुकानात इकडे तिकडे उडते आहे."

रस्त्याच्या समोरच एक छोटे हा
टेल होते. टेबल पुसणार्या बाईने मुलांना
विचारले, तुम्हाला काही मदत हवी आहे का?"
"व्हिडिओच्या दुकानात एक चिमणी आहे,
आणि दुकान बंद आहे. दुकान २ आढवडे बंद
रहाणार आहे, “ हैरी म्हणाला.
जार्जम्हणाला, "दुकानाचा मालक येऊन
दरवाजा उधडू शकतो आणि चिमणीला सोडवू
शकतो. तो कुठे रहातो ते तुम्हाला माहित आहे
का?"
बाईने मानेनेच नाही म्हटले.
"तो सुट्टीवर गेला आहे. पण मुलांनो तुम्ही
चिंता करू नका. एकच तर चिमणी आहे.
बाहेर इतक्या चिमण्या आहेत," बाई म्हणाली.





जार्जआणि हैरी घरी आले. त्यांनी आईला आणि वडिलांना
दुकानात अडलेल्या चिमणीसंबंधी सांगितले.



वडिल व्हिडिओ दुकानाच्या मालकाला ओळखत होते. त्यांनी मालकाला फोन करायचा प्रयत्न केला. पण फक्त आन्सरिंग मशिन वर निरोप आला." मालक कुठेतरी बाहेर गेला असेल....! वडिल म्हणाले.

"आपण कसहि करून चिमणीला वाचवायलाच हवे" जार्जम्हणाला.

वडिलांनी मान हलविली......"त्या चिमणीली विसरून जा...." ते म्हणाले. " चिमणी ही काही लवकर काळाच्या पडद्याआड जाइल अशी प्रजाती नाही की जिला वाचवायलाच हवे.... "



दुपारी देघे परत दुकानावर गेले. चिमणी खिडकीच्या कांचेवर  वर खाली उडून बाहेर पडायचा प्रयत्न करीत होती.

चिमणीला काचेतून जार्ज, हैरी दिसले. तिने उडणे बंद केले.

हैरी म्हणाला, "तिच्या डोळ्यात मला विशेष चमक दिसली. तिला कळले आहे की आपण तिला सोडवायचा प्रयत्न करीत आहोत."



जार्जने आपल्या भावाकडे पाहिले. " संकटकाळी लोकांना कोण मदत करतो?" त्याने विचारले.

" बंद दरवाजा तोडून आत कोण घुसू शकतो?"

"मला माहित आहे, मला माहित आहे....."  हैरी ओरडला.



त्यानंतर जार्जव हैरी धावतच
पोलिस स्टेशनवर गेले.



"व्हिडिओचे दुकान!" जार्जने रडत रडत सांगायला सुरवात केली.
"तिथे मोठी कठिण परिस्थिती निर्माण झाली आहे. दुकान बंद आहे आणि आत एक चिमणी मरणाच्या वाटेवर आहे."
"काय, व्हिडिओच्या दुकानात कुणी संकटात आहे?"
मुलांनी मान हलवून "हो" सांगितले. हैरी म्हणाला, "ती खिडकीत उडून बाहेर पडायचा प्रयत्न करते आहे. आणि दुकान तर १३ जानेवारीपर्यंत उघडणार नाही."
"उडते आहे?" पोलिसाने विचारले...."तुम्ही एका पक्षासंबंधी बोलत अहात?"
"हो, एका चिमणीबद्दल !, तुम्ही कृपाकरून दुकानाचा दरवाजा तोडाल का?"
पोलिसाने बसकणच मांडली. तो म्हणाला," काल नववर्षाची पूर्वसंध्या होती. त्यामुळे खूप काम होते. माझी झोपही झाली नाही. तुम्ही आता इथून लवकर जा...निधा..नाहीतर तुम्हालाच चांगली अद्दल घडवीन."
"पण मग त्या चिमणीच काय होईल?" जार्जने विचारले.
"ती चिमणी स्वर्गातून बोलू शकेल......" पोलिस म्हणाला.





दुसर्या दिवशी आईने मुलाशी मरणाबाबत चर्चा केली. "अरे, प्रत्येकजण केव्हा ना केव्हातरी मरतोच. हेच अंतिम सत्य आहे." "तुमचे आजोबा - आजी मरण पावले. आपली मनीमाऊ पण मरून गेली. त्या छोट्या चिमणीची तुम्ही चिंता करू नका. बाहेर भरपूर चिमण्या आहेत."

"पण ती अजून जिवंत आहे. "हैरीने कार्नफ्लेक्स दूधात मिसळत असतांना सांगितले. "ती आम्ही संकटांतून वाचवू म्हणून वाट पहात आहे."

"तुम्ही बागेतल्या चिमण्यासाठी पोळीचे तुकडे का नेत नाही? " वडिलांनी सुचविले.

"त्यामुळे काय होईल?" जार्जने विचारले.

वडिल हसले.

"तुमच्या हे लक्षात येईल की चिमण्या इतक्या असतात की एखादी चिमणी मेली तरी काही फरक पडत नाही."



व्हिडिओच्या दुकानात आता चिमणी उडत नव्हती.
ती एका कपाटावर बसली होती. तिचे पंख गळून गेले होते.
तरीहि तीच्या डोळ्यात आशेचा किरण दिसत होता.
जार्जआणि हैरी जिन्यावर बसून विचार करू लागले.
"मला वाटतं की उद्यापर्यंत ती मरून जाईल," हैरी म्हणाला.

जार्जला हा विचारच करायचा नव्हता.
"बाबा नेहमी म्हणतात की तुम्ही कोणतेही काम कायद्याचा आधार घेऊन करणार असाल तर तुम्हाला सर्वात मोठ्या अधिकारी व्यक्तिची मदत घेतली पाहिजे" तो म्हणाला.
"मग आपल्या शहरात कोण आहे सर्वात मोठा अधिकारी ?, कोण आहे आपल्या शहराचा मालक?, ........श्रीमती मैकेंजी, महापौर!"



एका माणसाने श्रीमती मैकेंजीच्या घराचा दरवाजा उघडला आणि म्हणाला,"क्षमा करा। तुम्ही आता महापौरांना भेटू शकणार नाही. त्यांची आत्ता वृत्तपत्रकाराबरोबर सभा चालू आहे."

"आम्ही त्यांची सभा संपेपर्यंत इथे थांबतो."

जार्जम्हणाला व ते तिथेच जिन्यावर बसले.



श्रीमती मेकैंजीने त्यांना बघितले असणार.....कारण त्या त्वरीत बाहेर आल्या. त्यांनी पत्रकारांकडे एक कटाक्ष टाकला व म्हणाल्या, "रस्त्याच्या करासंबंधी विसरून जा. तुम्हाला वृत्तपत्रात छापण्यासाठी काहीतरी आकर्षक बातमी हवी आहे ना? तर मग माझ्याबरोबर चला. मी तुम्हाला अगदी लोकांना आवडेल अशी गोष्ट देते.”





श्रीमती मेकैंजी शहरातील सर्वांना ओळखत होती. सर्वप्रकारच्या चाव्या जवळ असणार्या सुरक्षा रक्षकालाही ओळखत होती. सर्वजण व्हिडिओ दुकानाच्या मागिल बाजूस गेले. रक्षकाने दरवाजा उघडला. हैरी आणि जार्जआत पळाले. ते सरळ खिडकीपाशी गेले. चिमणी जमिनीवर पडली होती. पण ती जिवंत होती. जार्जने तिला आपल्या हातात उचलून घेतले. त्याच्या बोटांना चिमणीच्या हृदयाची धडधड जाणवत होती.



जार्जआणि हैरीला चिमणीला लगेच सोडून द्यायचे होते.
पण त्याआधी श्रीमती मेकैजीला चिमणी, आणि मुलाबरोबर फोटो काढून हवा होता. छायाचित्र घेतांना तीव्र प्रकाशापासून चिमणीला संरक्षण द्याव लागलं. फोटो काढून झाल्यावर श्रीमती मेकैंजी पत्रकारांना म्हणाली, "एका संवेदनाशील महापैराला कोणताही प्रश्न कमी महत्वाचा नसतो."

नंतर जार्जने आपल्या मुठीत ठेवलेल्या चिमणीला थोडा वेळ तसेच बसू दिले. तिचे हृदय लहान घड्याळासारखे टिक टिक करत होते. जार्जने तिच्या अंगावरून प्रेमाने हात फिरवला. गोंजारलं. चिमणीने डोळे उघडले. पंख थोडे हलविले. आणि जार्जकडे अती विश्वासाने पाहिलं. मग चिमणीने आपले पंख पसरले, फडफड केली आणि आकाशात, मोकळ्या हवेत उडून गेली.
जार्जवाटले की ती खाली कोसळेल.
पण चिमणी बाहेर उडाली आणि क्षणांत दिसेनाशी झाली.






मुलांच्या आईने  कौतुकाने मान हलवून म्हटले,  "मला वाटलं नव्हत की तुम्ही पुढे जाऊन असे काही कराल!"

वडिलांनी वर्तमान पत्रात श्रमती मेकैजी आणि चिमणीबरोबर काढलेला मुलांचा फोटो दाखविला.

"ती एक खूप चांगली महापौर आहे...."

जार्जम्हणाला.

"आणि खूप हुशार पण........"

वडिल म्हणाले.

वर्तमानपत्रातील फोटोच्या खाली लिहिले होते....

**"मुल आणि चिमण्यांची रक्षणकर्ती "**



त्यादिवशी दुपारी जार्जआणि हैरीने बागेत जाऊन चिमण्यांना पोळी खायला दिली. त्याना वाटत होते त्यांची चिमणी त्याच्यापैकी एक एसेल. पण ओळखणे शक्यच नव्हते. कारण ते ज्या ज्या चिमणीकडे पहात होते प्रत्येकीच्या डोळ्यात त्यांना त्याच भावना, तीच विश्वासाची चमक दिसत होती.......

**समाप्त**